पाताळगंगा नदीतून घरगुती व औद्योगिक प्रयोजनासाठी सिल्वेनस प्रॉपर्टीज लि.मौजे सावरोली व दहिवली ता. खालापूर जि.रायगड यांना ०.५७ दलघमी/वर्ष चा बिगर सिंचन पाणी (Bulk Water Entitlement) आरक्षणाबाबतचा प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. बिसिंआ २०१८/(३७०/२०१८)/सिं.व्य.(धो-२)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११/११/२०२०

**संदर्भ** : - १) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ ,ठाणे यांचे पत्र दि.२५/०७/२०१८
२) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१३/(४१५/१३)/सिंव्य (धोरण) दि. १६/८/२०१४
३) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१५/(४४/१५)/सिंव्य (धोरण) दि. १७/११/२०१६
४) शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/१५)/सिंव्य (कामे) दि. १७/११/२०१६
५) शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१८/(५११/१८)/सिंव्य (धोरण) दि. ०१/१२/२०१८

**प्रस्तावना:-**

संदर्भिय पत्र क्र.१ अन्वये कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे यांचेकडून पाताळगंगा नदीवरून सिल्वेनस प्रॉपर्टीज लि. मौजे सावरोली व दहिवली ता. खालापूर जि.रायगड या संस्थेस घरगुती व औद्योगिक वापराकरिता ०.५७ दलघमी मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क (Bulk Water Entilement) मंजुरी मिळणेबाबत प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. शासन निर्णय दि. १७/११/२०१६ नुसार सिंचन प्रकल्पातुन विविध प्रवर्गाकरिता क्षेत्रिय वाटप (Sectorial Allocation) निर्धारित करणे व बिगर सिंचन पाणी आरक्षण प्रस्तावास मंजुरी देणेबाबत निर्देश दिलेले आहेत .तथापि, नदीतुन बिगर सिंचनासाठी पाणी आरक्षणास मंजुरी देणेबाबातच्या अधिकाराबाबत उपरोक्त शासन निर्णयात उल्लेख झालेला नाही. तथापि,अधिसूचित नदी हा अधिसूचित प्रकल्प समजून दि.१७/११/२०१६ च्या शासन निर्णयात नमूद सक्षम स्तरावर संस्थेच्या व पाणी वापराच्या वर्गवारी नुसार मान्यता घेणे उचित आहे.या शासन निर्णयाच्या परिच्छेद ३.० अन्वये मा.मंत्रीमंडळ उपसमिती यांच्या मान्यतेने सदर संस्थेची मागणी ०.५७ दलघमी पाणी आरक्षणास मंजुरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

**१.०** मा. मंत्री, जलसंपदा यांचे अध्यक्षतेखाली दि. २२/१०/२०२० रोजी संपन्न झालेल्या मा.मंत्रिमंडळ उपसमितीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार व सदर बैठकीच्या मंजूर इतिवृत्तातील मुद्दा क्र. ३ नुसार अनुक्रमांक २ मधील नमूद संस्थेला त्यांचे नावासमोर नमूद केलेल्या मोठ्या प्रमाणात पाण्याच्या ( Bulk Water Entitlement) हक्कास, परिच्छेद २.० मधील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| **संस्थेचेनांव** | **पाणी वापराचा प्रकार** | **जलाशय/कालवा/ नदीचेनांव** | **मंजूर केलेला मोठ्या प्रमाणात पाण्याचा हक्क (Bulk Water Entitlement) (दलघमी)** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| सिल्वेनस प्रॉपर्टीज लि. मौजे सावरोली व दहिवली ता. खालापूर जि.रायगड | पिण्यासाठी व औद्योगिक | पाताळगंगा नदीवरून | ०.५०२१ (पिण्यासाठी)<br>०.०६४५ (औद्योगिक)<br>०.५७ दलघमी |

**२.०** उपरोक्त नमूद प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे .

१) शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१३/(४१५/२०१३)/सिंव्य(धोरण), दि. १६/८/२०१४ व शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/(प्र.क्र.२७४/नवि-३३),दि. १७/१२/२०१६ मधील तरतुदीं नुसार सिंचन पुर्नस्थापनेच्या खर्चाबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

२) बिगर सिंचन पाणी पुरवठयासाठी करारनाम्याचा सुधारीत नमुना व मार्गदर्शक तत्वे महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग शासन परिपत्रक क्र. बिपापू १००१/(७१३/२००१)/सिंव्य(धो), मुंबई- ३२, दि. ७/४/२००३ अन्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार करारनामा करण्यात यावा.

३) शासन परिपत्रक क्र. पापव -२०१५६/(प्र.क्र.४००/२०१५)/सिव्य (महसूल) दि.१५/१२/२०१५ अन्वये बिगरसिंचन पाणीवापराचे करारनामे करणे व नुतनीकरण वेळेवर करणे बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) जलस्त्रोत प्रदुषित करणाऱ्या पाणी वापरकर्त्याकडून दंडनीय पाणीपट्टी आकारणी करणेबाबत मार्गदर्शक तत्वे या विषयाबाबत शासन निर्णय क्र. पापव २०१५/(प्र.क्र.८८/२०१५)/सिंव्य (महसूल) दि. २१/४/२०१६ मधील अटींचे पालन करणे पाणी वापरकर्त्यांना बंधनकारक राहील.

५) महाराष्ट्र शासन,जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१०/(४०७/१०)/सिंव्य (धोरण), दि. २९/६/२०११ अन्वये करारनामा करताना बिगरसिंचन पाणीवापरकर्ते अंतिम पाणी मागणी प्रमाणे टप्याटप्याने पाणीवापर करण्याचे नियोजन नमुद करु शकतील. त्याचप्रमाणे महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाचे आदेश क्र. १/२०१८ मधील तरतुदीं व महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण यांच्या दि. २२ सप्टेंबर २०१७ रोजीच्या पाणी हक्क पाटप निकषांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) शासन निर्णय क्र. देवदु २०१५/(८३६/२०१५)/सिंव्य (कामे), दि. १७/११/२०१६ अन्वये पाटबंधारे विकास महामंडळाच्या अधिनियमातील तरतुदीनुसार सिंचन प्रकल्पांचे व्यवस्थापन पाटबंधारे महामंडळाकडे वर्ग करणे व पाणीपट्टीची रक्कम प्रकल्पांच्या सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास मान्यता देणेसाठीचा निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे. त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

७) पाणी उचलण्याची/ पुरवठ्याची जागा व क्षेत्रीय परिस्थितीनुसार इतर अटी शर्तीचा अंर्तभाव करून संबधित मुख्य अभियंता यांनी सविस्तर ज्ञापन तात्काळ निर्गमित करावे.

८) "This reservation is only the letter of support for the, water supply scheme or the industry as the case may be. Actual quantity of water that will be supplied every year shall be governed by the entitlement granted to the water user entity by the River Basin Agency based on the population and the reasonable use norm decided by this Authority and the yearly allocation declared by the prescribed Authority on the basis of reservoir contents of the year and shall be subjected to various provisions in the agreement that will be signed by the water user entity with River basin Agency."

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२०१११११५३५५७९७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2020.11.11 15:38:10 +05'30'

**(अ. अ. कपोले)**
शासनाचे सह सचिव

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.
८. मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
९. मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
११. अ.मु. सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सचिव,(प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१५. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
१७. अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे
१८. निवडनस्ती कार्यासन सिंव्य (धोरण).